भगवान श्री एकदंत मदासुर विनाशक अवतार!

महर्षी भृगुंचे चिरंजीव महर्षी च्यवन. श्रीच्यवनांच्या तपाचरणात राजा शर्याती कन्या सुकन्येने विघ्न आणले. शिक्षा रुपात च्यवनांनी तिच्यासोबत लग्न लावून देण्याची अट घातली. अन्यथा सगळ्या राज्याचा विनाश होणार हा विचार करीत राजकन्या ऋषीपत्नी झाली. तिने प्राणपणाने महर्षींची सेवा केली आणि प्रसन्न झालेल्या ऋषींनी वर मागण्यास सांगितला. देवी सुकन्येने अनेक व्यावहारिक सुखसाधनांसह ऋषींच्या तारुण्याची अपेक्षा केली. महर्षींनी देवतांचे वैद्य असणा-या अश्विनीकुमारांना पाचारण केले. त्यांनी तारुण्य प्रदानच्या बदल्यात यज्ञात आहुतीचा अधिकार मागितला. ऋषींनी होकार भरला. ऋषी तरुण झाले आणि अश्विनीकुमारांना हविर्भाग देणारा ऐतिहासिक यज्ञ महर्षींचे सासरे राजा शर्यतीकडे सुरु झाला.

यज्ञारंभीच तेथे देवराज इंद्र प्रगटले. सगळयांनी देवराजांचे स्वागत केले. पण देवराज आगतस्वागताच्या मानसिकतेत नव्हते. त्यांचा  आक्षेप होता अश्विनीकुमारांच्या आहुती ग्रहणाला. त्यांच्या लेखी ते रोगनिवारक सेवक आहेत. त्यांना समान दर्जा देवराजांना मान्य नव्हता. मात्र महर्षी च्यवन आपल्या मतावर ठाम होते. ते म्हणाले हा माझा शब्द आहे मी पाळणारच. अश्विनीकुमारांना आहुती मिळणारच.

देवराज प्रचंड संतापले आणि त्या संतापाच्या भरात त्यांनी चक्क वज्रच उगारले. सगळयांनी डोळे मिटले ऋषीवध पाहण्याचे पाप नको म्हणत मिटलेले डोळे थोडया वेळाने उघडले तर सगळयांना आश्‍चर्याचा मोठाच धक्का बसला. देवराजांना वज्र धरलेला हात हवेतल्या हवेत जणू गोठला होता. त्यांना हात हलवताच येईना.

उलट पक्षी माझ्यावर वज्र चालवतो म्हणजे काय? या विचाराने संतप्त महर्षी च्यवनांनी एक भीषण आरोळी ठोकली आणि त्यातून एक अक्राळविक्राळ राक्षस प्रगट झाला. प्रगटताच तो इंद्रावर चालून गेला. आधीच हात बंदिस्त त्यात अंगावर राक्षस. इंद्रांना शरण येण्याशिवाय पर्यायच नव्हता. त्या शरणागतीने ऋषी प्रसन्न झाले. देवराज सुटले. अश्विनीकुमारांना यज्ञात स्थान भेटले. सगळा यज्ञ संपन्न झाला. त्या निर्मित विघ्नाचे काय?

महर्षी आपल्या त्या तत्कालिक विकार ग्रस्ततेने व्यथित झाले आणि त्यावर उपाय विचारण्यासाठी स्वपिता, स्वगुरू महर्षी भृगुंच्या आश्रमात आले. महर्षी भृगु म्हणाले आपल्या मदपूर्ण दशेत, आत्मप्रभावाच्या मदाने परिपूर्ण होत तू निर्माण केलेला हा राक्षस मदासुर नावाने जगताला 'त्राहीभगवान!' करायला लावेल. एक परब्रह्म परमात्मा श्री गणराज प्रभूच आता यातून वाचून शकतात. त्यांनाच शरण जा आणि नियतीच्या परिणामाला लागणा-या काळाची प्रतीक्षा कर.

तिकडे मदासुर दैत्यगुरु शुक्राचार्यांना शरण गेला. दैत्यगुरुंनी असुर राज्याच्या उत्कर्षाचे ते कारण पाहिले आणि त्याला आदिशक्तीच्या उपासनेस बसविले. घोर तपाचरणाच्या परिणाम रुपात आदिमायेने अनेकानेक अद्‌भुत वरदाने, त्रैलोक्य विजय आणि पंचमहाभूतात्मक कोणत्याही पदार्थाच्या योगे मरण नसल्याचा अद्‌भुत वर दिले.

आता मदासुराच्या लेखी तो अमरच होता. परिणामी त्याची राक्षसीवृती प्रदीप्त झाली. 'स्त्रीमांसमदिरासक्त:!' या राक्षसीवृत्तीने त्याने त्रिभुवनाला गिळंकृत केले. मदासुर त्रिलोकनाथ झाला.

सगळया देवतांना आपापली पदे रिकामी करून द्यावीच लागली. देवता स्वर्गच्युत झाल्या. सगळयांनी आदिशक्तीच्या शरणतेचा मार्ग स्वीकारला. तिनेही सगळयांचे स्वागत केले. भोळा आशावाद मांडला की तो माझा भक्त आहे. माझ्या लोकात येऊन गोंधळ घालणार नाही. तुम्ही येथे सुखनैव रहा. देवतांना तात्कालिक आराम मिळाला.

देवतांचे हे आदिशक्ती शरणागतत्व राक्षसांना कळले ते संतापले. मदासुरास म्हणाले शक्तीलोकावर आक्रमण करून सगळयांना संपवू. मदासुर प्रारंभी तयार होईना पण सगळयांनी सांगितले. जगदंबा आमच्या पक्षात असेल तरच आम्हास

पूज्य. ती शत्रूंना आधार देत असेल तर तिला आदर कां द्यायचा? मदासुरास हे विवेचन पटले आणि श्रीआदिशक्तीच्या मणिद्वीप लोकावर आक्रमण करण्यात आले.

युद्धाचा परिणाम ठरलेलाच होता. मदासुर जिंकणारच होता. आता देवतांच्या नशिबात वनवासाला पर्यायच नव्हता. देवता अन्नान्नदशेत वनवास भोगू लागल्या.

तपाचरण करू लागल्या. तपाने शुद्ध झालेल्या त्यांच्या पुण्यफलरुपात सनकादिक ऋषींचे तेथे आगमन झाले. त्यांनी देवतांना श्रीगणेश रहस्य सांगितले. सनकादिकांच्या उपदेशानुसार देवतांनी गणेशाराधन केले आणि परिणाम रुपात स्वानंदनाथ परब्रह्म 'एकदंत' रुपात अवतीर्ण झाले.

श्री एकदंतांचा आणि राक्षस सैन्याचा आमनासामना झाला. विषयी, लोलुप आणि धनप्रीय या मदपुत्रांच्या विनाशानंतर श्रींनी मदासुराला आपले रहस्य कथन केले आणि शेवटी मदासुर श्री एकदंतांना शरण आला.

ही झाली श्री एकदंत अवताराची कथा कथनीय पाहू आगामी चतुर्थीला.

जय गजानन! जय गणेश!

संदर्भ ग्रंथ:- श्री मुदगल पुराण